**कुंभमेळयानिमित्त नाशिक शहराकरीता तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर सीसीटीव्ही यंत्रणा बसविण्याकरीता वाढीव रक्कमेच्या कामास प्रशासकीय मंजूरी देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टीटीसी-०२१५/प्र. क्र. १०४/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला,
मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ३१ मार्च, २०१५

**संदर्भ -**

१) **शासन निर्णय क्रमांकः आयएसएस १००९/प्र. क्र. ३१३/विशा-४, दि.२७.७.२०११.**
२) **शासन निर्णय क्रमांकः आयएसएस १०१३/प्र. क्र. ३२२/विशा-४, दि.३.१२.२०१४.**
३) **शासन निर्णय क्रमांक:आयएसएस १०१३/प्र. क्र. ३२२ (भाग-२)/विशा-४, दि.२०.१.२०१५**
४) **पोलीस आयुक्त, नाशिक यांचे क्र. कक्ष-१०/सिंहस्थ शाखा/सीसीटीव्ही यंत्रणा/२९८/२०१५, दि. २५.३.२०१५ चा प्रस्ताव.**
५) **शासन निर्णय क्रमांक: टीटीसी-०२१५/प्र.क्र.१०४/पोल-३, दि.२७.३.२०१५**

**प्रस्तावना -**

नाशिक व त्र्यंबकेश्वर येथे सन २०१५-१६ मध्ये सिंहस्थ कुंभमेळा होणार आहे. या कुंभमेळया दरम्यान सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून सीसीटीव्ही यंत्रणा कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय शक्तीप्रदान समितीच्या दि.१३.२.२०१४ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार सीसीटीव्ही प्रकल्पासाठी निधीची तरतुद गृह विभागाने करावयाची आहे. उच्च स्तरीय शक्तीप्रदान समितीच्या दि.११.८.२०१४ रोजीच्या बैठकीमध्ये कुंभमेळयानिमित्त तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर सीसीटीव्ही यंत्रणा उभारण्याचा निर्णय झाला आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्र.२ वरील दि.३.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये, नाशिक येथे कुंभमेळयानिमित्त तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर सीसीटीव्ही यंत्रणा बसविण्याकरीता रु. ७.११ कोटी इतक्या खर्चास प्रशासकीय तसेच निधी वितरणास वित्त विभागाच्या संमतीने मान्यता दिली होती. विषयांकीत कामासाठी निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी पोलीस आयुक्त, नाशिक शहर यांच्या अध्यक्षतेखाली खरेदी व तांत्रिक समिती स्थापन करण्यास शासन निर्णय दि.२०.१.२०१५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. खरेदी व तांत्रिक समिती सदस्यांच्या मान्यतेने ई-निविदा प्रक्रीया राबविण्यात येवून दि.२५.३.२०१५ रोजी समिती सदस्यांच्या उपस्थितीत ई-निविदा प्रक्रीयेतंर्गत व्यापारी लिफाफा खुला करण्याची प्रक्रिया राबविण्यात आली. यासंदर्भातील निविदा प्रक्रीयेमध्ये प्राप्त झालेल्या दर विचारात घेवून, याकामी वाढीव रक्कमेच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय-

सिंहस्थ कुंभमेळयासाठी नाशिक येथे एकूण १५२ ठिकाणी २७४ कॅमेरे बसविण्यासाठी येणाऱ्या एकूण रु. ७.११ कोटी रक्कमेच्या अंदाजपत्रकास शासनाच्या क्र. आयएसएस १०१३/प्र. क्र.

३२२/विशा-४ दि.३.१२.२०१४ चे शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदरहू कामासाठी प्राप्त झालेले निविदेचे दर आणि पोलीस आयुक्त, नाशिक यांचा संदर्भाधीन क्र. ३ वरील दि. २५.३.२०१५ चा प्रस्ताव विचारात घेता, नाशिक येथील सीसीटीव्ही प्रकल्प कार्यान्वित करण्यासाठी शासन याद्वारे रु. ४,८७,३२,४४३/- एवढया वाढीव रक्कमेच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९४/१५/व्यय-७, दि. ३१.३.२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०६१३२८२५२०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas Arjun Gaikwad

Digitally signed by Kailas Arjun Gaikwad
DN: CN = Kailas Arjun Gaikwad, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.04.07 15:20:52 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. प्रधानसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. प्रधानसचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, मुंबई
८. सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. पोलीस आयुक्त, नाशिक,
१०.विशेष पोलीस महानिरीक्षक,नाशिक परिक्षेत्र, नाशिक,
११.आयुक्त, नाशिक महानगरपालिका
१२.जिल्हाधिकारी, नाशिक
१३.पोलीस अधीक्षक, नाशिक (ग्रामीण)
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७.वित्त विभाग,कार्यासन व्यय-७
१८. निवडनस्ती, पोल-३